सिंधुदूर्ग जिल्ह्यात संभाव्य वादळापासून होणाऱ्या हानीपासून बचावकरण्यासाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी राष्ट्रीय आपत्ती प्रतिसाद दलास पाठवण्याबाबत झालेल्या वाहतूक खर्चास मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**(मदत व पूनर्वसन विभाग, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग)**
शासन निर्णय क्र. आव्यप्र-२०२०/प्र.क्र.०६/आव्यप्र-१
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२
दिनांक : २७ जानेवारी, २०२०

**प्रस्तावना :**

केंद्रीय हवामान खात्याने दि. २२ ऑक्टोबर २०१९ रोजी दिलेल्या सुचनेनुसार दक्षिण कोकण विभागात वादळ वा-यासह अतिवृष्टीची संभावना व्यक्त केली होती. त्यानुसार संबंधित जिल्हाधिका-यांनी NDRF ची मागणी केली. त्यानुसार संचालक, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग यांनी NDRF च्या दोन टिम सिंधुदुर्ग येथे पाठविण्यासंदर्भातआवश्यक ती वाहन व्यवस्था करण्यासाठी जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना कळविले होते. त्यानुसार जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांनी वाहन व्यवस्था केली होती. त्यासाठी मे. एस इंटरनॅशनल ट्रॅव्हल्स यांनी सादर केलेल्या देयकास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :**

२. हवामान खात्याने दिलेल्या पूर्वसुचनेनुसार येथून NDRF च्या दोन टिम सिंधुदुर्ग येथे पाठविण्यासाठी दोन ट्रक व दोन बस मे. एस इंटरनॅशनल ट्रॅव्हल्स यांच्याकडून उपलब्ध करण्यासाठी झालेल्या रू. २,६७,७५०/- (अक्षरी रू. दोन लक्ष सदुसष्ट हजार सातशे पन्नास मात्र) खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर बाबीवर झालेल्या खर्चाचे देयक अदा करण्यासाठी लेखाशिर्ष (२२४५-२२४७) मध्ये तरतूद उपलब्ध करून ती रक्कम जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर यांना विभागीय आयुक्त, कोकण यांच्यामार्फत वितरित करण्याबाबतची कार्यवाही कार्यासन म-११ यांनी करावी.

४. सदर आदेश वित्त विभाग व उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग यांनी आव्यप्र-२०१९/प्र.क्र.७९/आव्यप्र -१ या प्रकरणामध्ये दिलेल्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनुक्रमे ३९०/२०१९/व्यय-९, दिनांक ०७/१०/२०१९ व अनौपचारिक संदर्भ क्र. ५२/उद्योग-४, दिनांक ०७/११/२०१९ दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२००१२८१२३८३९३२१९ असा आहे. सदरचा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

SHRIRANG SHRIPATI GHOLAP

Digitally signed by SHRIRANG SHRIPATI GHOLAP
DN: CN = SHRIRANG SHRIPATI GHOLAP, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST DEPT
Date: 2020.01.28 12:49:55 +05'30'

**(श्रीरंग घोलप)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, कोकण
२) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर
३) महालेखाकार, (महाराष्ट्र-१) मुंबई
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५) कक्ष अधिकारी, कार्यासन म-११
६) सह सचिव तथा वित्तीय सल्लागार (आव्यप्र-६), मदत व पूनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) लेखाधिकारी (आव्यप्र-६), मदत व पूनर्वसन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) निवडनस्ती, आव्यप्र-१.